राज्यातील आदिवासी भागात राबविण्यात येणा-या विविध योजनांचा आढावा घेण्यासाठी आढावा समितीची स्थापना करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१९/प्र.क्र.१/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

शासन कार्यनियमावलीनुसार राज्यातील जनतेचा सर्वांगीण विकास करण्यासाठी मंत्रालयात प्रत्येक प्रशासकीय विभाग कार्यरत आहे. आदिवासींचा सर्वागीण विकास करण्यासाठी शासन कार्यनियमावलीनुसार आदिवासी विकास विभागाची स्वतंत्र निर्मिती करण्यात आलेली आहे. महिला व बाल विकास विभागामार्फत महिलांचे व बालकांचे प्रश्न तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत राज्यातील अंगणवाडी विषयक कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. अन्न व नागरी पुरवठा विभागामार्फत धान्य पुरवठा करण्यात येत असून ग्राम विकास विभागामार्फत ग्रामीण विकासाच्या योजना व आरोग्य विभागामार्फत आरोग्य विषयक सुविधा राज्यातील जनतेला उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. शासनाकडून राबविण्यात येणा-या योजनांचा आदिवासींना पुरेसा लाभ मिळतो किंवा नाही याचा आढावा घेण्यासाठी श्री विवेक पंडीत, माजी विधानसभा सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली आढावा समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**.

राज्यात आदिवासी भागात राबविण्यात येणा-या सर्व योजनांचा आदिवासीं बांधवांच्या जीवनमानात आतापर्यंत कशाप्रकारे परिणाम झालेला दिसून आलेला आहे, त्यांच्या जीवनमानात आमुलाग्र बदल घडून आणण्यासाठी कोणत्या उपाययोजना प्रभावीपणे राबविता येतील याबाबत शासनास शिफारस करण्यासाठी श्री विवेक पंडीत, माजी विधानसभा सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली आढावा समिती गठीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर आढावा समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील. समितीने राज्यातील आदिवासी क्षेत्रात प्रामुख्याने लक्ष केंद्रित करावे.

१) आदिवासी भागातील आदिवासींच्या रोजगाराचा प्रश्न सोडविणे.
२) आदिवासींना दर दिवशी किमान किती वेतन जीवनचरिर्थ चालविण्यासाठी आवश्यक आहे त्याचा अभ्यास करणे, आता किती वेतन मिळत आहे.
३) आदिवासींना रोजगाराची संधी उपलब्ध करुन देण्यासाठी काय करता येईल याचा अभ्यास करुन शासनास शिफारस करणे.
४) आदिवासी भागातील मुले शिक्षणापासून वंचित रहाणार नाहीत शाळाबाहय रहाणार नाहीत यासाठी उपाययोजना सूचविणे.
५) आदिवासींना जुन्या रुढी परंपरामधुन बाहेर काढुन वैज्ञानिक दृष्टिकोनाकडे त्यांचे मन वळविणे व कुटुंब नियोजनाचे महत्व पटवुन कुटुंब नियोजन करण्यास प्रवृत्त करणे.

**आढावा समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.**

| अ.क्र. | पदनाम व विभाग | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | श्री विवेक पंडीत,माजी विधान सभा सदस्य | **अध्यक्ष** |
| २ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण विभाग | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव ,सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव ,अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव-२ , नगर विकास विभाग | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ९ | प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ),<br>ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| १० | सचिव ,महिला व बाल विकास विभाग | सदस्य |
| ११ | महासंचालक ( माहिती व प्रसिध्दी) माहिती व प्रसिध्दी विभाग | सदस्य |
| १२ | आयुक्त,अन्न व औषध प्रशासन,मुंबई | सदस्य |
| १३ | राज्य मिशन संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन | सदस्य |
| १४ | महासंचालक, राजमाता जिजाऊ माता - बाल आरोग्य व पोषण मिशन,मुंबई | सदस्य |
| १५ | आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक | सदस्य |
| १६ | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, | सदस्य |
| १७ | सह सचिव/उप सचिव , आदिवासी विकास विभाग | सदस्य सचिव |

सदर समितीची बैठक आदिवासी विकास विभागामार्फत दर ३ महिन्यानी आयोजित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३०१४३५५७४१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINITA VED SINGAL

Digitally signed by VINITA VED SINGAL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=df64f63ee52f1faf8b406f825c358391702d61c47fee432e91064
86eb53c4867, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=a1d52427a2acd827d0c5733431ed650d5cae8020c5730
ba60883661c3be91486, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=VINITA VED SINGAL
Date: 2019.02.05 16:11:19 +05'30'

**( विनिता वेद सिंगल )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री/राज्यमंत्री (आदिवासी विकास ) मंत्रालय,मुंबई

५) सर्व मंत्री/राज्यमंत्री,मंत्रालय,मुंबई
६) मा.विरोधी पक्ष नेता,महाराष्ट्र विधानसभा,विधामंडळ,मुंबई
७) मा.विरोधी पक्ष नेता,महाराष्ट्र विधानपरिषद,विधानमंडळ,मुंबई
८) मा.श्री विवेक पंडीत,अध्यक्ष,आदिवासी क्षेत्र आढावा समिती,मुंबई
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१०) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
११) अपर मुख्य सचिव ( वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) अपर मुख्य सचिव ( नियोजन.),नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
१३) प्रधान सचिव,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४) प्रधान सचिव ,माहिती व तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय,मुंबई
१५) प्रधान सचिव ,सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१६) प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
१७) प्रधान सचिव,शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
१८) प्रधान सचिव,अन्न नागरी पुरवठा विभाग,मंत्रालय,मुंबई
१९) प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
२०) प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) सचिव,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
२२) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
२३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
२४) महासंचालक,माहिती व प्रसिध्दी,मंत्रालय,मुंबई
२५) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य जीवनउन्नत अभियान (MSRLM)
२६) सर्व मंत्रालयीन विभाग
२७) सर्व विभागीय आयुक्त
२८) सर्व जिल्हाधिकारी
२९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३०) सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
३१) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
३२) सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हापरिषद)
३३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
३४) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
३५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
३६) महासंचालक, राजमाता जिजाऊ माताबाल आरोग्य व पोषण मिशन-,मुंबई
३७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
३९) सर्व जिल्हा कोषागार
४०) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
४१) निवड नस्ती कार्यासन)६)